GR-200408271246550001-0100

**शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा कालावधीच्या पुढे शासन सेवेत राहण्याची पात्रापात्रता आजमाविण्यासाठी करावयाच्या पुनर्विलोकनाबाबत तसेच पुनर्विलोकनांती मुदतपूर्व सेवानिवृत्त केलेल्या अधिकारी/कर्मचा-यांनी सादर केलेल्या अभिवेदनाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:- विपुस-१००२/प्र.क्र.१४८/२००२/१५,**
**मंत्रालय, मुंबई -३२.**
**दिनांक:- २२ , सप्टेंबर, २००३.**

**वाचा :** १)शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एसआरसी १०७६/५८०/१५, दिनांक ८.४.१९७६
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : एसआरसी १०७७/१५, दिनांक २.९.१९७७
३)शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक :एसआरसी १०८५/१०२९/४३/१५, दिनांक १२.५.१९८६
४)शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक :संकीर्ण १०८९/प्र.क्र.४१/१५, दिनांक १५.५.१९९०

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ च्या नियम १० (४) व नियम (६५) अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी/कर्मचा-यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा या पैकी जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांचे सेवा पुनर्विलोकन करुन त्यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे.

२. शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवापुनर्विलोकनाची विहित वयोमर्यादा, विहित सेवावधी, पुनर्विलोकनाचे निकष, कार्यपध्दती, सेवापुनर्विलोकनांती मुदतपूर्व सेवानिवृत्त केलेल्या अधिकारी/कर्मचा-यांनी अभिवेदन सादर केल्यास अभिवेदनावर करावयाची कार्यपध्दती या व अशा अन्य बाबीसंदर्भात शासनाने वेळोवेळी आदेश निर्गमित केले आहेत. शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवापुनर्विलोकन व अभिवेदनासंदर्भात शासन पुढीलप्रमाणे आणखी सूचना देत आहे :-

१. (अ) शासकीय अधिका-यास/कर्मचा-यास गैरवर्तणुकीच्या कारणास्तव विभागीय चौकशी सुरु करुन सक्तीने सेवानिवृत्त करता येते. तथापि जवळचा मार्ग अवलंबिण्याकरीता म्हणून केवळ त्यास सेवापुनर्विलोकनाद्वारे मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्यात येऊ नये.
(ब) कर्मचारी वर्ग अतिरिक्त झाला म्हणून किंवा काटकसर म्हणून सेवेतून कमी करण्यासंबंधीच्या नियमांचे/आदेशांचे अनुपालन न करता केवळ अशा कारणास्तव शासकीय सेवकास मुदतपूर्व सेवानिवृत्त करण्यात येऊ नये.

२. शासकीय सेवकाने मुदतपूर्व सेवानिवृत्तीची ३ महिन्याची नोटीस अथवा नोटीस ऐवजी ज्या कालावधीचे वेतन अथवा धनादेशासह मुदतपूर्व सेवानिवृत्तीचे आदेश स्विकारण्यास नकार

दिल्यास त्याचा नकार दोन राजपत्रित अधिका-यांच्या समक्ष नोंदवून घ्यावा अशा वेळी नोटीस किंवा आदेशाची प्रत पोच देय डाकेने संबंधिताच्या निवासी पत्त्यावर पाठवावी. नोटीस किंवा आदेशाची प्रत पाठवितांना संबंधिताने अमुक व्यक्तीकडे अमुक दिनांकास त्यास दिलेली नोटीस/आदेश स्वीकृत करण्यास नकार दिल्याने अशा परिस्थितीत या नोटीस आदेशाची प्रत पोच देय डाकेने पाठविण्यात येत आहे याबाबतचे स्वतंत्र पत्र सोबत पाठवावे. अशा प्रकरणी त्या सेवकाने सदर नोटीस स्विकारण्यास नकार दिल्यास दुस-या दिवशीच्या मध्यपूर्व पासून ही नोटीस लागू होते.

३. अकार्यक्षमतेच्या कारणावरुन जर मुदतपूर्व सेवानिवृत्त केले असेल आणि अभिवेदनावर विचार होऊन संबंधित सेवकावर अन्याय झाला असे जर स्पष्ट होत असेल आणि त्यास पुन्हा सेवेत रुजू करुन घेतल्यास किंवा मुदतपूर्व सेवानिवृत्त केलेल्या अधिकारी/कर्मचा-याने न्यायालयात याचिका दाखल केल्यास आणि न्यायालयाने सदर अधिकारी/कर्मचा-यांची सेवा पुढे चालू ठेवण्याचे आदेश दिल्यानंतर त्यास पुन्हा सेवेत रुजू करुन घेतल्यास किंवा न्यायालयाने खंडीत कालावधीबाबत कोणतेही विवक्षित आदेश न दिल्यास अशा अधिकारी/कर्मचा-याचा मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या दिनांकापासून ते सेवेत रुजू होण्याच्या दिनांकापर्यंतचा खंडीत कालावधी हा कर्तव्य कालावधी म्हणून धरण्यात यावा.

३. सर्व मंत्रालयीन विभाग, विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांनी शासकीय अधिकारी/कर्मचारी यांचे सेवापुनर्विलोकन करताना तसेच मुदतपूर्व सेवानिवृत्त केलेल्या अधिकारी/कर्मचा-यांनी अशा आदेशाविरुध्द अभिवेदन सादर केल्यास किंवा न्यायालयात याचिका दाखल केल्यास अशा प्रकरणी कार्यवाही करताना वरील सूचना विचारात घ्याव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( वि.रा.वाळवे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव ,
सर्व राज्यमंत्र्यांचे स्वीय सहायक,
महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई,
महालेखापाल,महाराष्ट्र-२,नागपूर,
अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
मुख्य सचिव/अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या नियत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासन अधिकारी/कक्ष अधिकारी,
निवड नस्ती.